ई-साहित्य प्रकाशन

२६.०१.०९
अंक : १०

# सारे जहाँसे अच्छा

नेटाक्षरीतर्फे सर्व भारतीयांना प्रजासत्ताक दिनाच्या हार्दिक शुभेच्छा

आज भारताचा ६० वा प्रजासत्ताक दिन.
स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशात अनेक स्थित्यंतरे झाली.प्रगती पथावर विजयी मार्गक्रमण करत असतांनाच अनेक समस्या देखील विकासाच्या मार्गात अडथळे उभारत गेल्या.पण भारतीय खचले नाहीत. मुक्त अर्थव्यवस्थेत जागतिक स्तरावर स्वतःचा ठसा उमटवत कला, क्रीडा,साहित्य,विज्ञान,तंत्रज्ञान अशी अनेक शिखरं भारतीय काबीज करत आहेत.





ह्या निमित्तानेच भारतीय मनांची स्पंदनं अनुभवुया नेटाक्षरीच्या ह्या अंकात..

## ह्या अंकात वाचा....



नेटाक्षरी हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

## ..नव्या मनूचे स्वप्न..

जग थोडेसे बदलले तरी काही बिघडले नाही
नव्या मनूचे स्वप्न पाहणे आम्ही सोडले नाही
कोण कळेना आपुला दूजा,जग हे स्वार्थी बनले
पाश रेशमी तरी प्रेमाचे आम्ही तोडले नाही

आज घराचे वासे आमुच्या का न कळे हे फिरले
वैफल्याने ग्रासुनी घरटे आम्ही मोडले नाही
माणुसकीचा ऱ्हास आमुच्या हळू हळू होतांना
खापर त्याचे दुजा शिरावर आम्ही फोडले नाही

दोष जयांचा आहे त्यांच्या पदरी टाकले माप
साप सोडूनि भुईस कधीही आम्ही झोडले नाही
दोष आमुचा दाखविणारे कुणी भेटले मार्गी
त्यांचे म्हणणे अट्टाहासे आम्ही खोडले नाही

विज्ञानाचा वर मनुजाला शाप भासतो आहे
त्याचे नाते संहाराशी आम्ही जोडले नाही
जग थोडेसे बदलले तरी काही बिघडले नाही
नव्या मनूचे स्वप्न पाहणे आम्ही सोडले नाही

- कर्नल अशोक सायनाकर,पुणे

## ..चला उठा..

चला उठा अता राष्ट्रवीरहो
त्वरा करा त्वरा करा
स्वप्नीचा अपुल्या राष्ट्र घडविण्या
कंबर कसा अन पुढे सरा

कुणी न बाकी आता येणे
नच तयांची वाट पाहणे
एकजुटिच्या केरसुणीने
झाडून काढू सगळा कचरा

सुख समृध्दि प्रगतशीलता
विजयी राष्ट्र अन असो शांतता
स्वप्नदेश हा सत्य घडविण्या
परिश्रमांची कास धरा

झुको उद्याला दुश्मन सारे
वाहो प्रितीचे शीतल वारे
आन बाण अन शान जयाची
असा तिरंगा उंच धरा

- डॉ.अविनाश सोनवणे, UK

## ..आपण साले मध्यमवर्गीय..

मला खुप राग येतो,शासनकर्त्यांचा
लोकशाहीची थट्टा मांडणाऱ्या पुढाऱ्यांचा
माणुसकी वेठीला धरणाऱ्या नोकरशहांचा
थोबाडं रगवून कॅमेऱ्यासमोर पोपटपंची करणाऱ्या सेलिब्रिटीजचा

माझा राग असाच असतो साध्यासुध्या कारणाने येत नाही
पण जन्मतःच मुका असतो,शेजाऱ्यालाही ऐकू जात नाही
६० वर्षे झाली म्हणे स्वातंत्र्याला
पण स्वातंत्र्याचा अर्थ आमच्या दळभद्री डोक्यात शिरत नाही

तुमचाही राग असाच असतो ?
अन्यायाविरुध्द बोलतांना तुमचाही आवाज बसतो ?
म्हणजे तुम्ही १०० टक्के मध्यमवर्गीय आहात
नशिबी आलेलं आयुष्य खुरडत खुरडत जगत आहात

आपण साले मध्यमवर्गीय,आपला राग असाच
वेश्येच्या गुंडाळून ठेवता येणाऱ्या अंथरुणासारखा
दर ४ दिवसांनी विपरीत घडतं काही तरी
लगेच बाहेर येतो राग,पोकळ आणि जुनाट वास मारणारा

- महेंद्र कुलकर्णी (सॅम),मुंबई

## ..भारत ऐसा..

एक एक देशातील माणूस
हिमालयासम शुभ्र असावा
प्रेम,बंधुता आणि शांतीचा
मंत्र येथल्या नभी घुमावा

निर्भयतेचा श्वास मोकळा
पशुपक्ष्यांनी इथल्या घ्यावा
माणुसकीच्या फुलांमधोनि
सुगंध बनूनी विवेक यावा

फुलून यावा निसर्ग इथला
स्वातंत्र्याचा वारा वहावा
धन संपत्ती अलोट व्हावी
वंचित येथे कुणी नसावा

घडवील भावी पिढीस सुंदर
असा नागरिक इथे घडावा
ज्योत ज्योत मी उजळीन ऐसा
हर ज्योतीने वसाच घ्यावा

दीपस्तंभ होऊन जगाला
नवा आगळा प्रकाश द्यावा
आकाश व्हावे इथे ठेंगणे
भारत ऐसा उन्नत व्हावा

- अहं ब्रम्हास्मि,पुणे

## ..माझ्या प्रियतम भारत देशा..

हिंदुस्थाना आर्यावर्ता
गर्वे गाऊ तुझीच गाथा
तुझ्याचसाठी विनम्र माथा
तूच आमुचा भाग्यविधाता
तूच आमची वैभवरेषा
माझ्या प्रियतम भारत देशा
रामायण घडले ज्या भूमीवर
गीता कथिली जिथे मनोहर
त्या भूमीतच जन्म मिळावा
भाग्य आमुचे असे खरोखर
ब्रम्हा,विष्णू,तूच महेशा
माझ्या प्रियतम भारत देशा
परकीयांचे पाऊल पडले
जुलूमाने जन जेरीस आले
अभिमानी मन पेटून उठले
तुझ्याचसाठी प्राण वाहिले
बलीवेदी ही देत संदेशा
माझ्या प्रियतम भारत देशा
या भमीशी निष्ठा ज्याची
या भूमीवर प्रिती ज्यांची
नाते त्यांचे अमुचे अतूट
पंथ भेद ना त्यास अडविती
अभिमानाने गर्जती दिशा
माझ्या प्रियतम भारत देशा

- शैलजा शेवडे,नवी मुंबई

## ..गणतंत्र दिवस..

आला गणतंत्र दिवस आला
नेमेचि येतो तसा येईल
लाल किल्ल्यावर नेहमी सारखा सोहळा होईल
आमचे सैनिक पंतप्रधानांना सलामी ठोकतील
सैनिकांच्या कवायती होतील,नवीन शस्त्रं प्रदर्शित करतील
हर राज्यातील तरुण तरुणी फ्लोटवर राज्याचा उत्कर्ष दाखवतील
बाळ गोपाळ मंडळी आधी कडाक्याच्या थंडीत कुडकुडतील
मग उन्हात करपून जातील
पंतप्रधान छापील भाषण वाचून दाखवतील
तेच ते रटाळ भाषण ऐकून श्रोते कंटाळतील
घोषणाबाजी होईल,नंतर सगळे पंचतारांकित हॉटेलमध्ये पार्ट्या झोडतील
गरीब बिचारा नागरिक देशसेवेच्या गप्पा मारत उपाशी राहिल
जसा तो गेली ६१ व वर्ष तेच करत आलाय
ह्याची नाही कोणाला चिंता,जो तो आपली पोळी ओढतोय
ढेरीवर हात फिरवतोय भरले खिसे रिकामे होत आहेत
सकाळी फडकणारे झेंडे सर्वत्र विखुरले आहेत
तुडवले जात आहेत पायदळी,त्याची नाही कुणाला तमा
जो तो आपला आनंद साजरा करतोय
“गणतंत्र दिवस झिंदाबाद”

- श्रीकांत पाटील,मुंबई

## ..आपला हिंदुस्थान..

अथांग सागर..उत्तुंग हिमालय
हिरवे गालिचे.. रेगिस्तान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

चाणक्या इथला,इथलाच बिरबल
खगोल ज्योतिषी..इथले अव्वल
इथेच जन्मले..कित्येक गणिती
विचारवंत,विद्वान !
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

शिवबा..राणा,इथेच जन्मले
इथेच उमटली लक्ष्मीची पाऊले
गोविंद सिंग अन अशोक,चन्नम्मा
इथलाच पृथ्वीराज चौहान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

टागोर इथले,इथल्याच टेरेसा
पूजली गेली,इथेच अहिंसा
बोस,पटेल,टिळक,भगत हे
मूर्तिमंत स्वाभिमान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

तेंडल्याचा अफाट छक्का
तसाच लताचा सूर ही पक्का
बच्चन,कलाम,कल्पना चावला
या भूमीची शान !
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

सरहद्द इथली हळवी नाही
शक्ती आमची फसवी नाही
बुऱ्या नजरेची चिरेल गर्दन
हर एक इथला जवान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

वेळ खरी ही आली आता
विजयी करु प्रजेची सत्ता
पुन्हा निघेल धूर सोन्याचा
गाठेल थेट अस्मान
कुठे फुल तर कुठे पत्थर
असा हा हिंदुस्थान..आपला हिंदुस्थान

- मंदार चोळकर,पुणे

## .. भव्यभारती..

नवीन भारत असा घडवू
सुवर्ण मुकूटी माणिक मढवू
भूमातेच्या चरणांवरती
नवसृजनाचा प्रसाद चढवू

आधुनिक होऊ शेतकरी
परंपरा तरी वारकरी
जोडू किनारे प्रेमाचे
नद्यांचेही कितीतरी

नको हिंसा नको दहशत
शत्रू उतता दावू ताकद
सदैव जागे राहूनि राखू
अपुली सीमा अपुली सरहद्द

दास होऊया परिश्रमाचे
कर्तव्य निभावू चतुःश्रमाचे
होऊनि मुक्त व्यसनातूनि
मोह त्याग विश्रामाचे

पोर दिसता कुणी उपाशी
कवळूनि घेऊ त्यास उराशी
कणवेने भरवुनि कवळ
मैत्र जोडूया करुणेशी

व्यवहार करु सचोटीने
काम करु हातोटीने
स्वच्छ करुया भ्रष्टाचारा
मानवतेच्या तुरटीने

नाठाळ नसे आप परका
दोषी बंधुही रिपु सारखा
सोडवू खटले थटलेले
न्यायात नको फक्त तारखा

उजळून टाकू दिव्यभारती
भयमुक्त गाऊ काव्यभारती
पोलादाच्या कणखरतेने
नवी निर्मुया भव्यभारती

- सारंग भणगे,पुणे

## ..सैतानाचे बेटे..

सदा भ्रष्ट खादीतला
दुनिया गुलाम आहे
बेट्याला सैतानाच्या
अमुचा सलाम आहे

वासनेने कौरवांच्या
पांचाली नग्न जाहली
अपुल्याच क्रिडेमध्ये
दंग घनश्याम आहे

बळकावली कशी ही
भरताने आज गादी
अन जन्मभरासाठी
वनवासी राम आहे

नसे दोन हात जागा
निजण्यास आज आम्हा
बंगलेच ज्यांचे त्यांना
भूखंड इनाम आहे

खुडूनि इथे कळयांना
शेज सजविली ज्यांनी
त्या दलाल माळ्यांसंगे
बगिचा निलाम आहे

करुनि हजार पापे
फिरे उजळ माथ्याने
समाजाच्या या मित्राला
वर्दीतला नाम आहे

ना मिळे कण अन्नाचा
पोर उपाशी मरतं
तेजीमंदी खेळायाला
भरले गुदाम आहे

खालून टेबलाच्या
पसरला हात ज्यांनी
ते महर्षी शिक्षणाचे
मागती छदाम आहे

तलवार लेखणीची
छाटील मुंडकी सारी
जगताच्या या धन्याला
झुकूनि सलाम आहे

- प्रशांत पोरे,पुणे

## ..नवीन भारत..

जुन्या नव्याची घालून संगत फुलवू भारत नवा
तुम्ही आम्ही मिळून सारे घडवू भारत नवा

सदा इथे नांदावी शांती,उगा कुणाशी वैर नको
वाकडी नजर टाकणाऱ्याची या भूमीवर खैर नको
आपल्या सामर्थ्याचा साऱ्या जगी असो गवगवा
तुम्ही आम्ही मिळून सारे घडवू भारत नवा

कष्टकऱ्याला काम मिळो,शेतकऱ्याला दाम मिळो
लेखक,गायक,विचारवंत,सृजनांनाही नाम मिळो
गरीबाच्याही घरात अन्न अन हवा रातीला दिवा
तुम्ही आम्ही मिळून सारे घडवू भारत नवा

क्रिकेट,फुटबॉल खेळतांना कधी,उडवून द्यावी विट्टी
पॉप,रॉक म्युझिक सोबत लावणीला मारावी शिट्टी
पिझ्झा,सँडविच,बर्गर बरोबर वडापावही हवा
तुम्ही आम्ही मिळून सारे घडवू भारत नवा

तरुणाईला इथल्या आता आकाशाने द्यावी साद
मना मनात प्रत्येकाच्या घुमुदे फक्त एकच नाद
चंद्रच काय पण मंगळावरी आपला झेंडा हवा
तुम्ही आम्ही मिळून सारे घडवू भारत नवा

- आकाश बिरारी, UK

## शंभर कोटी लोकांच्या..लोकांसाठीच्या देशा

शंभर कोटी लोकांच्या अगाध चिरंतन देशा
पूसायच्या बाकी आहेत काही अस्पष्ट रेषा
धर्माच्या जातीच्या मनामधल्या रातीच्या

शंभर कोटी लोकांच्या निश्चल सनातन देशा
गाठायच्या बाकी आहेत काही उज्वल रेषा
समृद्धीच्या उन्नतीच्या स्वप्नांमधल्या प्रगतीच्या

शंभरकोटी लोकांच्या अस्वस्थ शोषित देशा
आखायच्या बाकी आहेत काही नियम रेषा
सत्याच्या न्यायाच्या विरोधात अन्यायाच्या

शंभर कोटी लोकांच्या माझ्या स्वतःच्या देशा
चल सत्य करुया स्वप्ने पुर्ण करुया आशा
आपणच मारू आपल्या हाती आपल्या भविष्यरेषा

- आनंद 'भारत' माने,सोलापूर

## ..स्वप्न..

काल कोणीतरी म्हणालं, " भारत आता महासत्ता होणार
अन आम्ही सुध्दा यंदा चंद्रावर जाणार"
हसलो मनातच,हसत हसत झोपी गेलो..

बघतो तर काय,मला भेटायला आले..सांगू कसा आहो,कोण कोण राव
आले पहिले राजे..शिवाजी,दूसरे सुभाषचंद्र बोस,तिसरे टिळक

पाहून ह्या साऱ्यांना,माझं मलाच कळेना
घडाघडा बोलणारा मी पण,जीभ एक शब्द बोलायला वळेना
सगळे एकदम बोलत सुटले

म्हणाले ,काय रे ?आधुनिक भारताच्या स्वप्नाला हसतोय होय रे ?
आम्ही जन्मभर झटलो,त्या स्वप्नासाठी मातीत मिटलो
तुझं काय ? तुला मिळालं स्वातंत्र्य फुकट..
तुझी कुठे गेली विकेट ?तू आपला रम,बघत क्रिकेट
२०२० साली देशाला महासत्ता बनवायचे असेल तर
उठ लाग कामाला
आधी झाड आपलं घर,नंतर अंगण,कचरा..कचरा कुंडीतच टाक
आपलं काम आपणच करायचं बिंबव मनावर
सगळ्या लोकांशी प्रेमाने वाग,नाहीतर बरे तुझ्यापेक्षा जनावरं
कायदे पाळ,नियम पाळ,जरा वाग माणसासारखा
पैसे घेणं देणं बंद कर,म्हणजे कमी होईल भ्रष्टाचार
पॉप सोबत ऐकत जा जरा इंडियन,सुधार जरा आचार विचार

नाही कुणी सुधारत फक्त फळयावर लिहून सुविचार
सिनेमातली गांधीगिरी आचरणात आणा थोडी
कुठवर करणार विदेश वारी ?
देशप्रेमाची लागू द्या गोडी
फक्त राजकारणावर बोलण्यापेक्षा पुढे या
देशाचे नेतृत्व हाती घ्या
नाहीतर निदान मतदान तरी करा,चांगल्या लोकांना मदत करा
आजचे पोर तुम्ही,उद्याचे नेते
ह्या म्हाताऱ्यांचं सोडा,ह्यांना बोलायला काय जाते?
उठा कामाला लागा,यश तुमचंच आहे,तुमची वाट बघतंय
देशाला बलवान करा
इथे कामटे,साळस्कर,करकरे,उन्निकृष्णन झालेत बहु,होतील बहु

तुम्ही लढा,मृत्यूवर चालून जावू
बघ नवीन भारत उभा असेल
तुझं अन आमचं स्वप्न
तुला मग तेव्हा पूर्ण होतांना दिसेल,जगून बघ..
इतक्यात मी उठलो,डोळे चोळत सुटलो
करीत गेलो विचार,आचरणात आणले जर का हे विचार
नवा भारत उभा राहील,नवी महासत्ता जन्मा येईल..

- ग्रीष्म गुंजाळ ,पुणे





## ..एक अविरत प्रयास..

एक अविरत प्रयास निश्चल,निस्तब्ध मनाचा
गुदमरल्या क्षणांच्या गर्तेत आयुष्याचा अर्थ शोधण्याचा

एक अनोखा संकल्प प्रत्येक कल्पनेला साकारण्याचा
साकारतांना आलेल्या अडचणींच्या डोंगरांना बिलगण्याचा

एक मेघ वर्षाव विचारांचा ,अठराविश्वे दारिद्र्य वाहून नेण्याचा
कुबेराचं ऐश्वर्य पेरुन धरतीत,मातीचं मोल जपण्याचा

एक इच्छा पोलादी मनगट बनून पळपुट्या राजकारणाला हलवण्याची
दबलेल्या आर्त किंकाळ्यांना ज्वालामुखी बनवण्याची

एक पक्का मानस तळपता सूर्य होण्याचा
निराशेच्या गर्द काळोखाला आशेने कराकरा कापण्याचा

एक यौवन आता विजेसारखं लखलखणारं
शस्त्र,अस्त्र वापरुन दुष्कृत्यांची चिरफाड करणारं

एक मिमांसक प्रज्ञाशक्ती राजकारणाला राजकारणाने मिटवण्याची
एक प्रखर भक्ती न्यायापुढे नतमस्तक होण्याची

एक बुभुक्षिताची जिज्ञासा प्रश्नांना भुईसपाट करण्याची
एक विलक्षण जिद्द बलशाली बिजाची,कडेकपारी भेदून जगण्याची

एक तळमळ आता,जखमेला सुर देण्याची
प्रतिकुलतेचे पंख कापून आसमंत शोधण्याची

एक सुनिश्चय आता,धरतीमातेचं रुदन थांबवण्याचा
न्यायाचं रक्त सांडणाऱ्यांना सांडांना,त्यांचचं रक्त पाजण्याचा

एक निर्धार शेवटी,झोपड्यांची आसवं पुसण्याचा
कल्पनेच्या विचारमंथनातून नवा भारत घडवण्याचा

एक प्रण सुनिश्चित भगतसिंग,आझाद होण्याचा
बघ्याचे रोल संपवून खरा हिरो बनण्याचा

- कल्पना लोहारे

## ..जय भारत जय भारत..

धवलगिरीच्या हिमशिखरांतून
सह्याद्रीच्या उंच कड्यातून
गंगा यमुना गोदावरीच्या
शुभ्र स्फटिकसम शीत जलातून
घोष एक हा घुमू लागला
जय जय भारत ! जय जय भारत!
भेदातीत गर्जना होतसे
जय जय भारत ! जय जय भारत!

सुप्त अग्नि तो फुलून उठला
क्रांतीच्या कुंडात प्रकटला
पाश तोडण्या परदास्याचा
तृतीय नेत्र शंकरे उघडिला
पितृभूमी ही मुक्त कराया
सुपुत्र रणसागर हा आला
कोटिकंठरव कानी येई
जय जय भारत ! जय जय भारत!

स्वप्राणांच्या असंख्य ज्योती
स्वयें अर्पिल्या या देशाप्रति
निर्भय योध्दे रणात पडले
देऊनि निज प्राणांच्या आहुती
क्रांतिवीर ते अमर जाहले
विसरुनि घर अन विसरुनि नाती
तख्तावरही गर्जून गेले
जय जय भारत ! जय जय भारत!

आज कुठे ते सुतल जावे ?
का स्वार्थी तांडव चालावे ?
फुकाच आम्ही आज कशाला
स्वतंत्र आम्हा म्हणवूनि घ्यावे
उठा बंधु हो करा प्रतिज्ञा
स्वराज्य माझे सुराज्य व्हावे
एक मंत्र हा चला जपूया
जय जय भारत ! जय जय भारत!

- अभय भावे,रत्नागिरी





## ..नवीन भारत..

१०,९,८,०
आणि चांद्रयान तिरंगा घेवून
अंतराळात झेपावले
साऱ्या जगाने पुन्हा एकदा
भारत महान हे कबुल केले

२/११
नंतर लढवय्ये हिंदुस्थानी
एकतेने उठले
आतंकाच्या लढाईत सदैव तत्पर
भारत बलशाली हे दुनियेने पाहिले

१,२,३ आणि ०
पुज्य विश्वाचा पाया
ह्या भूमीनेच बहाल केला
विज्ञानाचे चमत्कार घडतच राहतील
भारत येणारे भविष्य महासत्तेने जाणले

१,२,३..१०००
मदर तेरेसा,महात्मा गांधी..महान शांतिदूत
क्रांतीअवतार परकीयांसमोर उभे ठाकले
हिरे असे सदा चमकतील
भारत लोकशाही वसा जगताने आठवावे

१,२,१००
करोड हात एकसंध होतील
युवा महासत्ता आणतील
मंदीचे अनेक बुडबुडे दूर हटतीलच
भारत आकडे जागतिक बाजारात उसळणारे

२०२०
स्वप्न प्रत्येक भारतियाचं
कला,संस्कृती,भाषा,परंपरांची जननी
अभिमान बंधुत्वाचा,द्योतक अशोकचक्राचा
भारत महान होता,आहे आणि राहणार
वचन नवीन भारत साकारणाऱ्या प्रत्येक भारतीयाचे

- भक्ती जामगावकर,अहमदनगर

## ..देस रंगिला रंगिला ( भावानुवाद )..

प्रत्येक पावली इथे धरा बदलते रंग
इथल्या बोली जणू रांगोळीचे सात रंग
हिरव्या पगडीत ऋतु सजले
निळ्या चादरीत आकाश दडले
नदी सोनेरी,हिरवा सागर गोड हा सजला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

लाल लाल गालांचा सूर्य करतो बघा खोडी
लाजऱ्या शेतांची बावरी पिवळी ही ओढणी
रंगली ओढणी,रंगीत अंगणी रंग हा उधळला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

अबिर गुलालाचे चेहरे इथे
मस्त अशी ही टोळी
रंग हास्याचे,रंग खुशीचे
नात्यांची जणू होळी
कथांचे रंग,शपथांचे रंग,स्नेहरंग दाटला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

प्रेमाचा रंग इथे गहिरा
चढल्यावर ना उतरे
सच्च्या प्रेमाचा पक्का रंग
पसरे पण ना विखुरे
रंग साजाचा,रंग लाजेचा सुंदर शर्मिला
देश रंगिला रंगिला,देश माझा रंगिला

- अभिजीत गलगलीकर,पुणे



# मी एक स्वातंत्र्यसैनिक..



## स्वातंत्र्यसैनिक माननीय वसंत हुदलीकर –

माझा जन्म बुधवार,१५ मार्च १९२५ साली झाला.वडील बाळकृष्ण हुदलीकर लँड रेकॉर्ड ऑफिसमध्ये असिस्टंट हेड क्लर्क म्हणून काम करीत.आई राधाबाई ही अशिक्षित गृहिणी असूनही तिने आम्हा सर्व भावंडांवर म्हणजे..रमाकांत (दादर),गोविंद (वसई),माधव(भांडुप),आक्का गंगुताई गोपाळ जोशी(बेळगाव निपाणी) व गोजरी अंतुशास्त्री जोशी (येवला) ह्यांच्यावर खुप चांगले संस्कार केले होते.

माझे शिक्षण ख्रिश्चन मिशनरी स्कूलमध्ये झाले.व्हर्निक्यूलर फायनल (७ वी),म्युनिसिपल शाळा क्र.२ व ५ मध्ये तर सेंट जॉर्ज हायस्कूल येथून ८ वी पास झालो.त्यावेळी शाळेत शिक्षकाची नोकरी मिळायला तेवढे शिक्षण पुरेसे होते.पण,मला मास्तरकी करायची नव्हती.

वयाच्या ५ व्या वर्षापासून गाडगेबाबांच्या खांद्यावर खेळायला मिळाले,त्यांचा सहवास मिळाला.त्यांच्या सेवावृत्तीचा परिणाम जीवनावर होऊ लागला.१९४१ साली सानेगुरुजी आमच्या शाळेत भेट द्यायला आले होते.त्यांचे व महात्मा गांधी ह्यांचे खादीचे धोतर व शर्ट वापरणे पाहिले व त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन मी खादीचे वस्त्र,अंथरुण व पांघरुण देखील खादीचे जे वापरायला सुरुवात केली ते आजदेखील खादीभांडारतर्फे खादीचा प्रचार करीत आहे.

त्या काळात मुरलीधर सोनवणे नामक एक हरिजन मुलगा मी आपल्या घरी ठेवून घेतला होता.तो गरीब पण मेहनती होता.वडिलांचे सहकार्य होतेच.आई सनातनी व स्वभावाने करारी व कठोर होती.पण,आईच्या माहेरी ताडपत्रीकर भगिनी काँग्रेसचे काम करणाऱ्या होत्या,त्यांचे सहकार्य मिळाले.

त्यावेळी हुदलीकर वाड्यात व गाडगेमहाराज मठात स्वातंत्र्यलढ्याच्या कामात वापरण्यासाठी रात्रीचे वेळी टाईम बॉंब तयार केले जात.त्या कामात घरातील सर्वांचे सक्रिय सहकार्य होते.त्यावेळी काही पोलिस अधिकारीही सहकार्य करीत.त्यातील उल्लेखनीय व्यक्ती कादरखान पठाण जातीने मुसलमान होते.पण त्यांची पत्नी मला भाऊ मानीत असे.पोलिस अधिकाऱ्याच्याच घरी मुक्काम असल्याने इतरांना संशय येत नसे.त्याचबरोबर गाडगेबाबांच्या मठातील २ खोल्या चळवळीच्या लोकांना राहण्यासाठी दिलेल्या होत्या.

त्यादरम्यान १९४२ ची चळवळ सुरु झाली.स्वातंत्र्य मिळेपर्यंत मोर्चे काढले गेले.माझ्याकडे मोडतोड खाते दिलेले होते.टेलिफोन वायरी तोडणे,पोस्टऑफिस जाळणे व सरकारी यंत्रणा खिळखिळी करणे,बस जाळणे यासारखी त्यावेळी धोकादायक असलेली कामे मी बेमालूमपणे व गुप्तपणे करीत असे.त्यावेळी घरात व बाहेर सर्वांचे अनमोल सहकार्य असे.जीवावर उदार होऊन मी व माझे सहकारी पडेल ते काम करीत असू.पोलिसांना घरात येण्यासही बंदी असे.घरातील स्त्रिया ठामपणे पुढे येत व खंबीरपणे पोलिसांना उत्तरे देत.

नंतर मी शालेय शिक्षणाला रामराम ठोकला व १९४२ साली घरातून पळून गेलो.मनात राष्ट्रसेवा करायची खुप तळमळ होती.पेठे विद्यालयातील ठकारबाई,ठकारसर,वैद्यसर,अभ्यंकर सर,घारपुरे व खरे सर तसेच आगाशेसर मला शिकवायला होते.त्या सर्वांची बोलणी खाल्ली पण मुंबईला आल्यावर निदर्शने व मोर्चे काढले.व त्यामुळे ८ ऑगस्टला मला मुंबईला अटक झाली.जेलमध्ये टाकण्यात आले.८ दिवसानंतर सोडून देण्यात आले.

चळवळीची भूमिका ठरवण्याची पहिली बैठक बुधवारपेठ येथील हुदलीकर वाड्यात झाली.वसंत नारायण नाईक,प्रकाश मोहाडीकर व शाम हरी देशपांडे यांनी नेतृत्व केले.

त्यानंतर ३ वेळा मला शिक्षा झाली.७ दिवस पोलिस कस्टडीत,कोर्ट उठेपर्यंत,नंतर ४० दिवस व शेवटी ४ महिने.एकदा मेनरोड,नाशिक येथील कापडाचं सरकारी दुकान जाळण्याचं काम माझ्या नेतृत्वाखाली सहकाऱ्यांनी केलं होतं.तिथे मी फिरकीच्या तांब्याच्या बॉंबने स्फोट घडवून आणला होता.आजही तसा बॉंब बनवायची पध्दत मला लक्षात आहे.चळवळीत आमचं एक तत्व ठरलेलं होतं.सरकारी नुकसान करायचं पण माणसं मारायची नाहीत.आणि ते तत्व आम्ही पाळलं.

नाशिकरोड जेलमध्ये असतांना मी सतरंज्या व नववार हातमागावर विणणे व चरखा सूत कातण्याचे काम केले.जेल म्हणजे माझ्यासारख्या तरुणांची शाळाच होती.तेथील वातावरणात वसंतराव नगरकर,मधु दंडवते,एस.एम.जोशी,काकासाहेब गाडगीळ यांच्यासारख्या अनेक विचारवंतांचा सहवास लाभला.त्यांची व्याख्यानेही ऐकायलाही मिळाली.भरपूर पुस्तके असल्याने खुप वाचनही केले.अनेक ठिकाणी तंबू टाकून जेल भरो आंदोलन सुरु होते.

### ..माझा हिंदुस्थान,माझा हिंदुस्थान..

माझा हिंदुस्थान,माझा हिंदुस्थान

हिमाचलाचे हीरकमंडित शिरभूषण भरदार
वक्षावर गंगा यमुनांचे रुळती मौक्तिक हार
कटिस तळपे मराठमोळ्या गोदेची तलवार
महोदधीचे चरणाजवळी गर्जतसे आव्हान

पेटविले पाषाण पठारावरती शिवबांनी
गळयामध्ये गरिबांच्या गाजे संतांची वाणी
ज्योतिसम समरात जळाली झाशीची राणी
त्या संतांचे,त्या वीरांचे प्रियतम तीर्थस्थान

रात सरे ये प्राचीवरती तेजाची रेषा
नव्या मनूचा घोष घुमे हा दुमदुमतात दिशा
जागृत झाल्या दलित जगाच्या बलशाली
आशा
स्वातंत्र्याचे समानतेचे उन्नत होय निशाण

- कुसुमाग्रज



## ..दे वरचि असा दे..

या भारतात बंधुभाव नित्य वसू दे,दे वरचि असा दे
हे सर्व पंथ संप्रदाय एक दिसू दे,मतभेद नसू दे

नांदोत सुखे गरीब-अमीर एक मतांनी
मग हिंदू असो ख्रिश्चन वा हो इस्लामी
स्वातंत्र्य सुखा या सकलांमाजि वसू दे
दे वरचि असा दे

सकळांस कळो मानवता,राष्ट्रभावना
हो सर्व स्थळी मिळुनी समुदाय प्रार्थना
उद्योगी तरुण शीलवान येथ असू दे
दे वरचि असा दे

जातिभाव विसरुनिया एक हो आम्ही
अस्पृश्यता समूळ नष्ट हो जगातूनी
खलनिंदका मनीही सत्य न्याय वसू दे
दे वरचि असा दे

सौंदर्य रमो घराघरात स्वर्गीयापरी
ही नष्ट होऊ दे विपत्ती भीती बावरी
तुकड्यास सदा या सेवेमाजी वसू दे
दे वरचि असा दे

- राष्ट्रसंत तुकडोजी महाराज

१९४३ साली सरकार वाडा,नाशिक येथे मी ध्वजारोहण केलं होतं.तेही ४० फूट उंच खांबावर चढून.५०० महिला भगिनींनी खांबाभोवती मानवी कडे केले होते जेणेकरुन पोलिस माझ्यापर्यंत पोहचू नयेत.त्यांनी अंगावर दंडुक्यांचा मार झेलला व अखेर मी तिरंगा फडकावला होता.

१९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यावर ही चळवळ थांबली.आजही मला पहिला प्रजासत्ताक दिन सुस्पष्ट आठवतो.वासाळी गावात त्र्यंबक मंदिरात माझ्या हस्ते झेंडावंदनाचा कार्यक्रम झाला होता.ऊर भरुन आला होता.खूप नाचलो होतो.आजपर्यंत देशासाठी घेतलेल्या कष्टांचं,भोगलेल्या शिक्षांचं चीज झालं होतं.

चळवळ जरी संपली तरी नंतरपण मी विधायक कामे करण्यात पुढाकार घेतला.भ्रष्टाचार विरोधी भूमिका,दारुबंदी,अधिक धान्य पिकवा मोहीम,आंतरजातीय विवाहांना प्रोत्साहन देणे सुरु केले.त्यावेळी राष्ट्र सेवादलाचे कार्य जुन्या नाशिकमध्ये फार मोठ्या प्रमाणात चालत असे.हुदलीकर वाड्यात ५००-६०० विद्यार्थी जमत असत.त्यातील २०-२५ विद्यार्थी झोपायला तिथेच असत.तिथे सुभाष वाचनालयाची सुरुवात झाली.पूर्वी यशवंत शिर्के सध्या दत्ता पगार ही राष्ट्र सेवा दलातील माणसं तिथं काम करत आहेत.

१९५४ साली मी कमल हिस मागणी घातली ,विवाह झाला आणि माझ्या वैवाहिक आयुष्यास सुरुवात झाली.कमलला सर्व कमलमामी च म्हणत.त्याही तळेगाव येथे जपानी भाषेतील शिक्षण व अंबर चरखा ट्रेनिंग घेतलेल्या होत्या.त्यांनी माझ्या कार्यात मला सतत सक्रिय सहकार्य केलं.कौटुंबिक जीवन जगण्यासाठी अपना भांडार या संस्थेची व प्रकाश वाचनालयाची स्थापना केली.

कमल अनेकांना राहण्यासाठी जागा,जेवण विनामूल्य उपलब्ध करुन देत असे.सर्वांचे आदरातिथ्य यथासांग होत असे.प्रकाश वाचनालयामुळे आमच्या कुटूंबाची एकमेकांशी ओळख झाली होती.व नंतर परिचयाचे रुपांतर नात्यात झाले.माझ्या बहिणीचा मुलगा प्रभाकर जोशी (भाई),माझे मेव्हणे (सख्ख्या मोठ्या बहिणीचे)पती आहेत.त्यांच्याशी रोजचेच भेटणे असते.

अनेक विधायक कामे करतांना खादी भंडारात संचालक,समर्थ बँक संचालक,हुतात्मा स्मारक,नाशिक येथे २५ वर्षांपासून व्यवस्थापक म्हणून कार्यरत आहे.हुतात्मा स्मारकातील जागेचा फायदा सुमारे ६५०० विद्यार्थ्यांनी आजवर घेतलाय.तेथे सध्या पालक व मुख्याध्यापकाची परवानगी मिळाल्यावर प्रवेश दिला जातो.राहणे विनामूल्य आहे.मुले जेवणाचा डबा बाहेरुन आणतात.किरकोळ काम करुन पैसा मिळवतात.येथे अभ्यास अनेक विद्यार्थ्यांनी शिक्षण पूर्ण करुन विविध क्षेत्रात नाव मिळविले आहे.

स्मारकात दर महिन्याच्या ९ तारखेस सर्व स्वातंत्र्यसैनिक एकत्र येतात व गीतापठण करतात.स्मारकातील साफसफाई विद्यार्थीच करतात.स्मारकाचा उपयोग समाजासाठी प्रदर्शने,शिक्षक गौरव यासारख्या कार्यांसाठीही केला जातो.कमलने देखील ह्या कार्यात सक्रिय सहभाग घेतला होता.विविध राजकीय पक्षदेखील राजकारण बाजूला ठेवून समाजपरिवर्तनाच्या दृष्टिने स्मारकात येऊन कार्य करतात.

कमलमामी आज नाहीत.३ मुलगे,२ मुली आहेत.सर्वजण विवाहित आहेत.सुस्थित असल्याने संसार सुखाने करीत आहेत.९ नातवंडे व ४ पतवंडे असा परिवार आहे.

मला महाराष्ट्र सरकारकडून ४००० रु.मानधन मिळते.पण मी स्वयंभू आहे.माझी सर्व कामे स्वतः मीच करतो.सकाळी बाजरीचा घाटा(गूळ बाजरीचे पीठ) घेऊन बाहेर पडतो.चहा,कॉफी,दूध कधीच घेत नाही.आहारावर पूर्ण नियंत्रण आहे.शिळी पोळी,भाकरी,भाजी,गूळतूप,फळे चालतात पण पाव चालत नाहीत.जेवणखाण केल्याशिवाय मी घरातून बाहेर पडत नाही.

विश्वबंधुत्वाचे व्रत अंगिकारलेले असल्याने सर्व घरे व घरातील माणसे मला आपलेपणाने बोलवतात.माझा लोकसंग्रह प्रचंड आहे.

आज देशात फोफावलेला भ्रष्टाचार,शिक्षण क्षेत्राचं बाजारीकरण,राजकारणी लोकांचं स्वतःपुरतं पाहून जनतेला विसरणं हे सारं पाहून खेद होतो.जास्त वाईट याचं वाटतं की,आपलीच माणसं आपल्या माणसांच्या विरोधात गेलीहेत.स्वातंत्र्यापूर्वी आम्ही इंग्रजांशी लढलो पण आज सत्तेवर भारतीय असून देखील त्यांच्याशीच झगडावं लागतंय.माझे अनेक विद्यार्थी पोलिसांत गेलले,जेव्हा त्यांना ऑफर केलेल्या लाचेविषयी ,स्वीकारायला नकार दिल्यामुळे झालेल्या बदली वगैरेविषयी सांगतात तेव्हा अतोनात वेदना होतात.विविध जादू मंतर करणारे,प्रवचन करणारे बाबा बुवा ह्यांच्यावर तर माझा अजिबात विश्वास नाही.ह्या पृथ्वीवर देव कुठे असेल तर तो आईत आहे.तिच्या पाया पडा,तिचे आशिर्वाद घ्या असं मी नेहमीच सांगत आलोय.जिवंतपणी अनेक वृध्दांचा त्यांच्या घरी छळ केला जातो व मेल्यानंतर त्यांच्या नावाने लोकांना जेवायला घातलं जातं ही कुठली रीत ?

पण,तरीही मी देशाच्या भवितव्याविषयी निराश नाही.आपल्या भारताचं चांगलंच होईल.भविष्य सुंदर असेल.आणि हा देश घडवण्याचं काम भारतीय स्त्रिया करतील.स्त्रियांचं विविध क्षेत्रातील योगदान बघून माझ्या अपेक्षा उंचावल्यात.मी आशावादी आहे.

जयहिंद

स्वातंत्र्यसैनिक माननीय वसंत हुदलीकर
( अतिथी संपादक )

# संपादकीय -

हा अंक बनवणं हा माझ्यासाठी विलक्षण भावुक अनुभव होता.अंकाचे अतिथी संपादक वसंत हुदलीकर ज्यांना सर्वजण प्रेमाने बाबा म्हणतात ,त्यांच्याशी माझी भेट एक योगायोगच होता.त्यांच्याशी बातचीत करतांना,त्यांच्याकडून मी स्वातंत्र्यगाथा ऐकत नव्हते तर त्यांच्या डोळ्यांत ती पहात होते.एक एक क्षण समोर जिवंत उभा होत होता.चळवळी दरम्यान पोलिसांनी त्यांच्या अनेक सहकार्यांचे केलेले राक्षसी छळ,झाडांवर ओळीने फासावर चढवलेले लोकं,मारहाण करुन निळी हिरवी झालेली शरीरं ह्यांचं वर्णन ऐकता ऐकता डोळ्यातून बांध फुटणे ही स्थिती मी अनुभवली.त्या अनाम वीरांनी किती प्रचंड बलिदान करुन मिळवून दिलेले हे स्वातंत्र्य आपण उपभोगत आहोत ह्याची खुप प्रकर्षाने जाणीव करुन देणारे,मी माझ्या देशासाठी इतकेच उत्कट काही कार्य केले पाहिजे ह्याची जाणिव करुन देणारे क्षण होते ते.




बाबांना भेटून अनेक गोष्टी शिकायला तर मिळाल्याच पण मला आजोबाही मिळाले.वयाची ८३ वर्षे पूर्ण करुनही त्यांचा उत्साह तरुणांना लाजवेल असा आहे.त्यांच्याशी बोलत असतांना भूतकाळातल्या आठवणींत रमून कधी ओघळणारे तर कधी मनमुराद हास्यविनोदाने हसून उत्साहाने फसफसणारे बाबा माझ्या मनावर एक सुवर्ण छाप उमटवून गेलेत.

नियमित आहारामुळे १९४२ सालचे त्यांचे १२४ पौंड वजन आजही कायम आहे.आजही घराबाहेर ते स्वतःच्या जबाबदारीवर कामानिमित्त एकटेच स्कूटरवर फिरत असतात.आंतरजातीय विवाह,अंधश्रध्दानिर्मूलन,खादी प्रचार,भ्रष्टाचार निर्मूलन ही कामं करत असतात.स्वतःचे शिक्षण अपुरे राहिले तरी सर्वांनी विशेषतः स्त्रियांनी खुप शिकून त्या शिक्षणाचा उपयोग करावा असे त्यांना वाटते.आई वडिलांना खुप मान द्या,शिका मोठे व्हा असा संदेश ते सर्वांना देत असतात.लहानांनी आदराने त्यांचा पाया पडणं हे देखील त्यांना मान्य नाही.ते म्हणतात,माझ्या पाया पडू नका..माझ्या शुभेच्छा तुमच्या बरोबर आहेतच पण तुम्ही आईचा पाया पडा.आपल्या मायभूमीसाठी काहीतरी करुन दाखवा.तसेच मराठी भाषेसाठीही.कारण,तीही आपली मातृभाषाच.बाबांना अनेक ठिकाणाहून भाषणासाठी आमंत्रणं येतात.तिथे ते आवर्जून देशभक्तीपर काही मराठी कविता,गीतं,सुविचार जनसमुदायास वाचून दाखवतात.व त्यांची पत्रकंही आवर्जून वितरित करतात.

एक आवर्जून नमूद करावसं वाटतंय,ते म्हणजे,हुतात्मा स्मारक,नाशिकच्या वाचनालयास मी ई साहित्य प्रकाशनाचा “ऑड वाटेच्या कविता” हा काव्यसंग्रह जेव्हा सस्नेह भेट दिला,तेव्हा बाबांनी देखील ई साहित्य प्रकाशनास एक अमूल्य भेट दिली ती म्हणजे,त्यांनी सांगितले की,ह्या काव्यसंग्रहातल्या सर्व कविता एक एक करुन रोज हुतात्मा स्मारकाच्या फलकावर लिहील्या जातील.

स्वातंत्र्यसैनिक बाबांविषयी लिहायला खरं तर सारं आकाश देखील अपुरं आहे.प्रजासत्ताक दिनाच्या ह्या अंकात त्यांनी अतिथी संपादक बनायचं मान्य केलं,दिवसभराच्या समाजकार्याच्या धावपळीतून वेळात वेळ काढून मला मुलाखत दिली आणि नेटाक्षरीला भरभरुन आशिर्वाद दिले,ह्याबद्दल मी नेटाक्षरीतर्फे त्यांचे मनःपूर्वक आभार मानते.

- स्वप्ना कोल्हे
( यजमान संपादक )



“ नेटाक्षरी ” हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

netaksharee@gmail.com